**२०२४-२५ या आर्थिक वर्षात मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम (सर्वसाधारण) योजनेअंतर्गत ३४- शिष्यवृत्त्या/ विद्यावेतने या उद्दिष्टाखाली खर्चास मंजूरी देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**

**शासन निर्णय क्र. मुरोनि-२०२५/प्र.क्र.४५/उद्योग-७**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक ३१/०३/२०२५

**वाचा:-**

१) उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र. योजना-२०१९/प्र.क्र.१२१/उद्योग-७, दिनांक ०१/०८/२०१९.

२) उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-०१९/प्र.क्र.१७७/उद्योग-७, दिनांक ३१/०८/२०१९.

३) उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र.योजना-२०१९/प्र.क्र.२३०/उद्योग-७, दिनांक २३/०१/२०२०.

४) उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र. योजना-२०१९/ प्र.क्र.१२१/उद्योग-७, दिनांक ११/११/२०२२.

५) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५/७/२०२४, दिनांक १२/०२/२०२५ व दिनांक १७/०३/२०२५.

६) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.आयएलई-२०२३/प्र.क्र.१४२/प्रशासन-३, दिनांक २४/०७/२०२३.

७) उद्योग सह संचालक (मुरोनिका), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.उसं/ मुंरोनिका/ Gen/ ले.नि.वि./ शिष्यवृत्ती/२०२४-२५/A-२७९, दिनांक १७/०३/२०२५

८) उद्योग सह संचालक (मुरोनिका), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.उसं/ मुंरोनिका/ पुनर्विनियोजन तरतूद/ शिष्यवृत्ती/२०२४-२५/A-३०५, दिनांक २०/०३/२०२५.

९) उद्योग सह संचालक (मुरोनिका), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.उसं/ मुंरोनिका/ Gen/ ले.नि.वि./ शिष्यवृत्ती/२०२३-२४/A-३५४, दिनांक २९/०३/२०२५

१०) उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, ज्ञापन क्र. IELD-19012/21/2025-ADMIN-1, दिनांक ३१/०३/२०२५.

**प्रस्तावना:-**

राज्यातील शहरी व ग्रामीण क्षेत्रातील सुशिक्षित युवक-युवतींची वाढती संख्या व उद्योग, व्यवसाय क्षेत्रात राज्यात विविध क्षेत्रात स्वयंरोजगार व रोजगाराच्या नवीन संधी उपलब्ध होत आहेत. या स्वयंरोजगार व रोजगाराच्या नवीन संधी विचारात घेऊन उद्योजकतेला चालना देणारी व सर्जनशिलतेला कालानुरुप वाव देणारी 'मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम' (CMEGP) ही सर्वसमावेशक योजना दिनांक ०१/०८/२०१९ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित करण्यात आलेली आहे. सदर योजनेची अंमलबजावणी उद्योग विभागाच्या अधिपत्याखालील उद्योग संचालनालयाच्या अंतर्गत कार्यरत जिल्हा उद्योग केंद्र तसेच खादी व ग्रामोद्योग मंडळ यांचेअंतर्गत कार्यरत जिल्हा खादी व ग्रामोद्योग कार्यालय यांच्यामार्फत पूर्णतः ऑनलाईन पद्धतीने करण्यात येत आहे.

**२.** CMEGP योजनेअंतर्गत लाभार्थ्यांसाठी प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्याकरीता महाराष्ट्र उद्योजकता विकास केंद्र (MCED) व MITCON Consultancy & Engineering Services Ltd या प्रशिक्षण संस्थांना मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार उद्योग संचालनालयाकडून दिनांक १७/०३/२०२५, दिनांक २०/०३/२०२५ व दिनांक २९/०३/२०२५ रोजीच्या पत्रांन्वये प्रस्तावित केल्यानुसार, सदर योजनेंतर्गत MCED व MITCON Consultancy

& Engineering Services Ltd या प्रशिक्षण संस्थेमार्फत बँकेद्वारे मंजूर केलेल्या कर्ज प्रकरणांतील लाभार्थ्यांना सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात ऑफलाईन प्रशिक्षण दिलेले परंतु प्रशिक्षण खर्च अदा करण्यासाठी प्रलंबित असलेले व सन २०२४-२५ या चालू आर्थिक वर्षात बँकेद्वारे मंजूर कर्ज प्रकरणातील लाभार्थ्यांवरील ऑफलाईन प्रशिक्षणावर झालेल्या खर्चाकरीता MCED या प्रशिक्षण संस्थेकरीता रुपये ९,४५,२१,०००/- व MITCON Consultancy & Engineering Services Ltd या प्रशिक्षण संस्थेकरीता ५,८२,१७,०००/- असा एकूण रुपये १५,२७,३८,०००/- इतक्या निधीची आवश्यकता आहे.

**३.** उद्योग संचालनालयाकडून MCED व MITCON Consultancy & Engineering Services Ltd या प्रशिक्षण संस्थांकरीता करण्यात आलेली निधीची मागणी लक्षात घेता, सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये "मुख्यमंत्री रोजगार निर्मिती योजना (सर्वसाधारण) ३४-शिष्यवृत्त्या/विद्यावेतने" या उद्दिष्टाखाली संदर्भ क्र. १० नुसार पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करून दिलेल्या तरतूदीतून MCED या संस्थेकरीता रुपये ९,४५,२१,०००/- आणि MITCON Consultancy & Engineering Services Ltd या संस्थेकरीता रुपये ५,८२,१७,०००/- असा एकूण रुपये १५,२७,३८,०००/- एवढ्या निधीच्या खर्चास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मुख्यमंत्री रोजगार निर्मिती योजनेअंतर्गत (सर्वसाधारण) सन २०२३-२४ व सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात प्रशिक्षण कार्यक्रमावरील खर्चाकरीता महाराष्ट्र उद्योजकता विकास केंद्र (MCED) या संस्थेकरीता रुपये ९,४५,२१,०००/- (अक्षरी नऊ कोटी पंच्चेचाळीस लक्ष एकवीस हजार फक्त) व MITCON Consultancy & Engineering Services Ltd या संस्थेकरीता रुपये ५,८२,१७,०००/- (अक्षरी पाच कोटी ब्याऐंशी लक्ष सतरा हजार फक्त) अशा एकूण रुपये १५,२७,३८,०००/- (अक्षरी पंधरा कोटी सत्तावीस लक्ष अडोतीस हजार फक्त) एवढ्या खर्चास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर रुपये १५,२७,३८,०००/- (अक्षरी पंधरा कोटी सत्तावीस लक्ष अडोतीस हजार फक्त) इतकी रक्कम वरील परिच्छेदात नमूद केल्याप्रमाणे महाराष्ट्र उद्योजकता विकास केंद्र (MCED) व MITCON Consultancy & Engineering Services Ltd या प्रशिक्षण संस्थांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरणाची जबाबदारी ही विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांची राहील.

**३.** वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.८०/ अर्थ-३, दिनांक २५/०७/२०२४ व त्यासोबतच्या परिशिष्टातील तरतुदीनुसार तसेच त्याअनुषंगाने उद्योग संचालनालयाकडून प्राप्त माहितीनुसार असे प्रमाणित करण्यात येते की,

a) मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रमाची राज्यामध्ये अंमलबजावणी करणेबाबत दिनांक ०१/०८/२०१९ अन्वये शासन निर्णय निर्गमित करण्यात आला असून यामध्ये अर्ज प्रक्रिया व प्रकल्प मंजूरी अंतर्गत करावयाची कार्यवाही, योजनेची अंमलबजावणी यंत्रणा, अनुदान वितरण व विविध मंजूरीस्तव समिती यांची माहिती दिलेली आहे. तसेच दिनांक ११/११/२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर योजनेची व्याप्ती वाढविण्यात आली आहे.

b) सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात वितरीत केलेल्या १००% निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र उद्योग संचालनालयाकडून सादर करण्यात आलेले आहे.

c) वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरीक्षक/महालेखापाल यांच्याकडून कोणतेही आक्षेप नाहीत.

d) सदर निधी स्वीय प्रपंची लेखा अथवा बँक खात्यात जमा न करता खर्च केला जाणार आहे.

**४.** सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च "मागणी क्र.के-७, २८५१-ग्रामोद्योग व लघु उद्योग, १०२-लघु उद्योग, (००) (२५) मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम (कार्यक्रम) (२८५१ ६६४५), ३४- शिष्यवृत्त्या/विद्यावेतने" या

लेखाशिर्षाखालील सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात येईल. तसेच सदर प्रयोजनार्थ होणारा प्रत्यक्ष खर्च निधी वितरणाच्या अधीन राहून करण्याची दक्षता घेण्यात येईल.

**५**. सदर शासन निर्णय प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव (उद्योग) यांना दिनांक २४/०७/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२५०३३१२३११५६०४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR
Date: 2025.03.31 23:15:36 +05'30'

**(अजित सासुलकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई-३२.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई-९३.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मुंबई.
७) लेखा अधिकारी, उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई.
८) सर्व विभागीय उद्योग सह संचालक (उद्योग संचालनालयामार्फत)
९) सर्व महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र (उद्योग संचालनालयामार्फत).
१०) वित्त विभाग (कार्यासन व्यय-१६), मंत्रालय, मुंबई -३२.
११) नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
१२) कक्ष अधिकारी (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवड नस्ती (उद्योग-७).